**मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतूदीनुसार वसूल होणारी एक टक्का मुद्रांक शुल्क अधिभाराची रक्कम नगर विकास विभागांतर्गत राबविण्यात येणा-या मुंबई, नागपूर व पुणे मेट्रो रेल्वे या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांच्या अंमलबजावणी यंत्रणेस वितरीत करण्यासाठीचे धोरण निश्चितीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६१/नवि-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० सप्टेंबर, २०२०

**संदर्भः-** १. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. ५६ दि. २१.०८.२०१५
२. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. ११९ दि. १७.१२.२०१८
३. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. १६ दि. ०८.०२.२०१९
४. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. १७ दि. ०८.०२.२०१९

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ व मुंबई महानगरपालिका अधिनियम-१९८८ मधील तरतूदीनुसार महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्प राबविण्यात येत असलेल्या महानगरपालिका क्षेत्रात स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, दान व फलोपभोग गहाण या संबंधीच्या संलेखांवर मुद्रांक शुल्क अधिनियमान्वये आकारावयाच्या मुद्रांक शुल्कात एक टक्का दराने अधिभार आकारुन वाढ करणे व सदर अधिभारापोटी वसुल केलेल्या रक्कमेएवढे सहायक अनुदान अशा प्रकाराचे प्रकल्प हाती घेतलेल्या अभिकरणाला/प्रकल्प अंमलबजावणी संस्थेला प्रदान करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदीनुसार अतिरिक्त मुद्रांक शुल्क ज्या दिनांकापासून वा नंतर आकारले जाईल त्यासाठी दिनांक ८ फेब्रुवारी, २०१९ हा दिनांक विनिर्दिष्ट करण्यात आला आहे.

नगर विकास विभागांतर्गत मुंबई, नागपूर व पुणे महानगर क्षेत्रात मुंबई महानगर प्रदेश विकास प्रधिकरण (एमएमआरडीए), मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (एमएमआरसीएल), महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.(महामेट्रो), पुणे महानगर प्रदेश विकास प्रधिकरण (पीएमआरडीए) अशा प्रकल्प अंमलबजावणी संस्थेमार्फत विविध मेट्रो रेल्वे प्रकल्प राबविण्यात येत असून सदर प्रकल्प मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतूदीच्या प्रयोजनार्थ महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्प म्हणून घोषित करण्यात आले आहेत. मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतूदीनुसार वसूल होणारी एक टक्का मुद्रांक शुल्क अधिभाराची रक्कम नगर विकास विभागांतर्गत राबविण्यात येणा-या मुंबई, नागपूर व पुणे मेट्रो रेल्वे या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांना वितरीत करण्यासाठीचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतूदीनुसार नगर विकास विभागांतर्गत राबविण्यात येणा-या मुंबई, नागपूर व पुणे मेट्रो रेल्वे या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांशी संबंधित महानगरपालिका क्षेत्रात स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, दान व फलोपभोग गहाण संबंधीच्या संलेखांवर मुद्रांक शुल्क अधिनियमान्वये आकारावयाच्या मुद्रांक शुल्कावरील एक टक्का अधिभारापोटी वसूल होणारी रक्कम संबंधित मेट्रो प्रकल्प अंमलबजावणी संस्थेला वितरीत करण्याची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे राहीलः-

१. सदर एक टक्का मुद्रांक शुल्कावरील अधिभाराची वसूली नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक विभागामार्फत दि. ८ फेब्रुवारी, २०१९ पासून करण्यात यावी. सदर वसूल होणारी रक्कम राज्याच्या एकत्रित निधीमध्ये या प्रयोजनार्थ घेण्यात येणा-या लेखाशिर्षांखाली जमा करण्यात यावी.

२. सदर एक टक्का अधिभारापोटी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा होणा-या रक्कमेचा तपशील नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी नगर विकास विभागाकडे सादर केल्यानंतर वित्त विभागाने खालील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे नगर विकास विभागास निधी उपलब्ध करून द्यावा.

| मागणी क्रमांक एफ-५ ४२१७-नगर विकासावरील भांडवली खर्च, ६०- नगर विकास विभाग इतर योजना, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका | |
|---|---|
| १. | (०१)(०१) मुंबई मेट्रो रेल्वे प्रकल्पास मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान (४२१७०८०१) (अनिवार्य), ५४-गुंतवणुका |
| २. | (०१)(०२) नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पास मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान (४२१७०८१९) (अनिवार्य), ५४-गुंतवणुका |
| ३. | (०१)(०३) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पास मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान (४२१७०८२८) (अनिवार्य) ५४-गुंतवणुका |

३. सदर महत्वकांक्षी नागरी परिवहन प्रकल्प राबविण्यात येत असलेल्या शहरांमध्ये एक टक्का मुद्रांक शुल्क अधिभारापोटी शासनाकडे जमा होणारी रक्कम वित्त विभागाच्या सहमतीने संबंधित शहराध्ये राबविण्यात येणा-या मेट्रो रेल्वे प्रकल्पांच्या अंदाजित प्रकल्प पुर्णत्व खर्चाच्या प्रमाणात संबंधित मेट्रो रेल्वे प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणांच्या -नागरी वाहतूक निधी॰ मध्ये नगर विकास विभागामार्फत उपलब्ध करून देण्यात येईल.

४. मुंबई महानगर प्रदेशात राबविण्यात येत असलेले विविध मेट्रो प्रकल्प हे वेगवेगळ्या यंत्रणांमार्फत राबविण्यात येत असल्याने व अशा प्रकल्पातील राज्य शासनाचा हिस्सा एमएमआरडीए वहन करीत असल्याने मुंबई महानगर प्रदेशातील प्रकल्पांना एक टक्का अधिभारापोटी द्यावयाचा निधी एमएमआरडीएकडे नगर विकास विभागामार्फत वर्ग करण्यात येईल. तद्नंतर एमएमआरडीएने संबंधित प्रकल्पांचा अंदाजित प्रकल्प पुर्णत्व खर्च विचारात

घेऊन सदरचा निधी त्या त्या प्रमाणात अन्य प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेकडे (एमएमआरडीएसह) वर्ग करावा. मुंबई शहर व परिसरातील मेट्रो रेल्वे प्रकल्पांना शासनाकडून वितरीत करण्यात येणा-या निधीचे प्रकल्पनिहाय वाटप एमएमआरडीएच्या स्तरावरून केल्यानंतर त्याबाबतचे लेखे एमएमआरडीएमार्फत ठेवण्यात यावे.

५. नागपूर व पुणे महानगर प्रदेशात राबविण्यात येत असलेल्या मेट्रो प्रकल्पांस मुद्रांक शुल्कावरील एक टक्का अधिभारापोटी द्यावयाचा निधी नगर विकास विभागामार्फत अनुक्रमे महामेट्रो, नागपूर व पीएमआरडीए, पुणे यांचेकडे वर्ग करण्यात यावा. पीएमआरडीएमार्फत, पुणे महानगर प्रदेशात राबविण्यात येणा-या प्रकल्पांचा अंदाजित प्रकल्प पुर्णत्व खर्च विचारात घेऊन, सदरचा निधी त्या त्या प्रमाणात अन्य मेट्रो रेल्वे प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेकडे (पीएमआरडीएसह) वर्ग करावा. यासंदर्भात महामेट्रो व पीएमआरडीएने जमा-खर्चाचा ताळेबंद ठेवावा.

६. सदर एक टक्का अधिभारापोटी वितरीत करण्यात येणा-या निधीच्या जमा-खर्चासाठी एमएमआरडीए, महामेट्रो व पीएमआरडीए यांच्या स्तरावर स्वतंत्र राष्ट्रीयकृत बँक खाते उघडण्यात यावे. सदर बँक खात्याचा जमा-खर्चाचा ताळेबंद एमएमआरडीए, महामेट्रो व पीएमआरडीएमार्फत शासनास दरवर्षी सादर करण्यात येईल. सदर निधी वितरण प्रक्रियेचे संनियंत्रण नगर विकास विभागामार्फत करण्यात येईल.

७. सदर एक टक्का अधिभारापोटी संबंधित मेट्रो रेल्वे प्रकल्पांना वितरीत करावयाचा निधी हा संबंधित मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता घेण्यात येणा-या कर्जाची परतफेड होईपर्यंत अथवा यासंदर्भात शासनाच्या पुढील आदेशापर्यंत या पैकी जे आधी घडेल तोपर्यंत वितरीत करण्यात यावा.

०२. सदरचा शासन निर्णय महसूल व वन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५/२०२०/म-१(धोरण) व दि.२८.०२.२०२० वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.११८/व्यय-३ व दि.०३.०७.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९१०१४४९३३८२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.09.10 18:21:59 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव

२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
९. मा. अपर मुख्य सचिव, मा. मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
११. मा. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१२. मा. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१३. मा. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. मा. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सचिव, मा. उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
१६. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१७. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१८. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि. मुंबई.
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि. नागपूर.
२१. महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
२२. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
२३. जिल्हाधिकारी, मुंबई शहर
२४. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर
२५. जिल्हाधिकारी, पुणे
२६. जिल्हाधिकारी, नागपूर
२७. जिल्हाधिकारी, ठाणे
२८. जिल्हाधिकारी, पालघर
२९. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
३०. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
३१. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे
३२. आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका
३३. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका
३४. आयुक्त, मीरा-भाईंदर महानगरपालिका
३५. आयुक्त, भिवंडी-निजामपूर महानगरपालिका

३६.आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका

३७.आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका

३८.आयुक्त, पनवेल महानगरपालिका, पनवेल

३९.सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.

४०.नोंदणी उपमहानिरीक्षक, मुंबई

४१.नोंदणी उपमहानिरीक्षक, ठाणे.

४२.नोंदणी उपमहानिरीक्षक, नागपूर

४३. नोंदणी उपमहानिरीक्षक, पुणे

४४.सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी, ठाणे

४५. सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी, पालघर

४६.सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी, पुणे

४७.सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी, नागपूर

४८.निवड नस्ती, नवि-७.